**उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितील महाविद्यालयांना /शैक्षणिक संस्थांना तंबाखू वापरावर नियंत्रण करण्यासाठी सूचना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-१११९/(प्र.क्र.६६/१४)/समन्वय**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः २४ जून, २०१५.

<u>वाचा -</u>

१) केंद्र शासनाचा सिगारेट व अन्य तंबाखूजन्य पदार्थ नियंत्रण कायदा २००३.
२) शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-१११९/प्र.क्र.६६/१४/समन्वय, दि.०७/०३/२०१५.

<u>**शासन परिपत्रक -**</u>

तंबाखूचा वाढता वापर आणि त्याच्या दुष्परिणामांमुळे जागतिक आरोग्य संघटनेने तंबाखूला जागतिक समस्या म्हणून घोषित केले आहे. जगामध्ये प्रत्येक वर्षी ५० लक्ष व भारतात अंदाजे १० लक्ष लोक तंबाखूमुळे होणाऱ्या आजारांनी मृत्यूमुखी पडतात. हृदयरोग, फुफ्फुसाचे आजार तसेच इतर असंसर्गजन्य रोगांचे कारण तंबाखूचा वापर आहे. लहान वयात तंबाखूची सवय लागल्याने ही सवय सोडणे कठीण जाते व यामुळे विविध असंसर्गजन्य आजार होण्याचा धोका असतो. शालेय /महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये व तरुणांमध्ये तंबाखू सेवनाचे वाढते प्रमाण हा चिंतेचा विषय आहे.

२. तंबाखू वापरावर प्रभावीपणे नियंत्रण करण्यासाठी केंद्र शासनाने सिगारेट व अन्य तंबाखूजन्य पदार्थ नियंत्रण कायदा Cigarettes and Other Tobacco Products ( Prohibition of Advertisement and Regulation of Trade and Commerce, Production, Supply and Distribution ) Act, 2003 तयार केला आहे. शालेय /महाविद्यालयीन विद्यार्थी तंबाखूचे व्यसनांच्या विळख्यात सापडू नयेत यासाठी प्रत्येक शैक्षणिक संस्थेत तंबाखू नियंत्रण कायद्याची अंमलबजावणी होणे आवश्यक आहे.

**३. तंबाखूजन्य पदार्थ नियंत्रण कायदा २००३ ची महत्वाची कलमे खालीलप्रमाणे आहेत. :-**

कलम ४ - शैक्षणिक संस्थांसह सार्वजनिक ठिकाणी धुम्रपानास बंदी आहे.

कलम ६( अ ) - तंबाखूविक्री लहान मुलांना आणि लहान मुलांकडून करून घेण्यास बंदी आहे.

कलम ६ ( ब ) - शैक्षणिक संस्थांपासून १०० यार्ड परिसरात तंबाखू विक्रीस बंदी आहे व तसे शाळेच्या प्रवेशद्वारावर फलक लावणे बंधनकारक आहे.

वरील नियमांचे पालन न केल्यास रु. २००/- पर्यंत दंड आकारला जाऊ शकतो.

**४. याकरीता उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितील प्रत्येक महाविद्यालय /शैक्षणिक संस्थेला खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे निर्देशित करण्यात येत आहे. -**

१) खाली देण्यात आलेल्या नमुन्यात महाविद्यालय /शैक्षणिक संस्थेत धुम्रपान बंदीबाबत सूचना फलक लावण्यात यावा.

**सूचना चिन्हांचा तपशील -**

अ) महाविद्यालय /शैक्षणिक संस्थेच्या प्रत्येक प्रवेशद्वारावर आणि प्रत्येक मजल्यावर, जिन्यासह तसेच प्रत्येक मजल्यावरील लिफ्टच्या प्रवेशद्वारावर पुढीलप्रमाणे फलक लावण्यात यावेत. :-




ब) महाविद्यालय /शैक्षणिक संस्थेमध्ये ज्यांच्याकडे तक्रार करावयाची आहे, त्या संबंधित व्यक्तीचे नांव, पत्ता व दूरध्वनी क्रमांक खालीलप्रमाणे नमूद करावा. :

तुम्हाला कुणी धूम्रपान करताना, तंबाखू खाताना दिसल्यास सूचना द्या

नावः:…………………………….............

पद: .........................................

दूरध्वनी............................................

२) महाविद्यालय /शैक्षणिक संस्थेपासून १०० यार्ड परिसरात तंबाखू व तंबाखूजन्य पदार्थांची विक्री बंदीबाबतचे फलक खाली दिलेल्या नमुन्यात महाविद्यालय /शैक्षणिक संस्थेच्या प्रवेशद्वारावर लावावेत.

**तंबाखूमुक्त शैक्षणिक संस्था**

या शैक्षणिक संस्थेच्या १०० यार्ड परिसरात सिगारेट आणि इतर तंबाखू उत्पादने विकण्यास बंदी आहे आणि तो २०० रुपये (दोनशे रुपये) दंडासह शिक्षापात्र गुन्हा आहे.

आदेशानुसार

३) महाविद्यालय /शैक्षणिक संस्था प्रमुखांनी खालीलप्रमाणे स्वाक्षरी केलेले घोषणापत्र फोटोसहित संबंधित शिक्षण संचालकांना पाठवावेत.

**" ( महाविद्यालय /शैक्षणिक संस्थेचे नांव, पत्ता ) मध्ये कुठल्याही तंबाखूजन्य पदार्थांचे सेवन होत नाही व तसेच महाविद्यालयाच्या /शैक्षणिक संस्थेच्या आवारात कुठलेही तंबाखूजन्य पदार्थ उपलब्ध नाहीत. आम्ही सिगारेट/ बिडीचे अवशेष व तसेच तंबाखू खाऊन थुंकणे याबाबतीत महाविद्यालय /संस्थेच्या आवारात तपासणी केली असता आम्हाला सदर गोष्टी आढळून आल्या नाहीत. "**

४. उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारीतील सर्व महाविद्यालय /शैक्षणिक संस्थांनी काटेकोरपणे वरीलप्रमाणे तातडीने कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीचा अहवाल दि.१० जुलै, २०१५ पर्यंत संबंधित शिक्षण संचालकांना पाठवावा व संबंधित संचालकांनी आपला अहवाल दि.१५ जुलै, २०१५ पर्यंत शासनास सादर करावा.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६२४१६२८१५७८०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2015.06.24 16:44:56 +05'30'

**का.रा.पिळणकर**
( कार्यासन अधिकारी )

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव ( उच्च व तंत्र शिक्षण विभाग ) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. संचालक, प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व संचालकांना विनंती की, त्यांनी सदर परिपत्रक त्यांच्या अखत्यारीतील सर्व शैक्षणिक संस्थांच्या निदर्शनास आणावे.
११. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे

१२.सर्व विभागीय शिक्षण सह संचालक, उच्च शिक्षण.
१३.सर्व विभागीय शिक्षण सह संचालक, तंत्र शिक्षण.
१४.सर्व विभागीय उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण.
१५.सर्व सह सचिव /उप सचिव /अवर सचिव /कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.डॉ. रुपेश महाजन, सल्लागार, राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कक्ष, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१७. निवडनस्ती.